**दिल्ली - मुंबई - इंडस्ट्रियल कॉरिडॉर प्रकल्पांतर्गत DMIC ट्रस्ट, राज्यशासन व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्यामध्ये झालेल्या स्टेट सपोर्ट ॲग्रीमेंट मधील तरतुदींनुसार विशेष हेतू कंपनीस (SPV) राज्य शासनामार्फत सुविधा, सवलती व सहाय्य उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. आयडीसी २०१३/प्र.क्र.४५०/उद्योग-१४**
**मंत्रालय, मुंबई- ४०००३२.**
**दिनांक:- १९ जानेवारी, २०१५.**

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या दिल्ली - मुंबई - इंडस्ट्रियल कॉरिडॉर या महत्वाकांक्षी प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र राज्यातील मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, नाशिक, पुणे, अहमदनगर, धुळे, नंदुरबार व औरंगाबाद या १० जिल्ह्यांचा समावेश आहे. सदर प्रकल्पामध्ये शेंद्रा (औरंगाबाद) येथील औद्योगिक क्षेत्र व दिघी बंदर औद्योगिक क्षेत्रांतर्गत कार्ला येथील मल्टी मॉडेल लॉजिस्टिक पार्क, औरंगाबाद येथील औद्योगिक क्षेत्रांतर्गत प्रदर्शन व कन्व्हेंशन सेंटर व पुणे -नाशिक व पुणे- औरंगाबाद महामार्गाच्या संदर्भात ट्रान्सपोर्ट अँड टेलिकम्युनिकेशन कॉरिडॉर या प्रकल्पांना मान्यता देण्यात आलेली आहे.

दिल्ली - मुंबई - इंडस्ट्रियल कॉरिडॉर प्रकल्पाच्या उभारणीसाठी केंद्रीय वाणिज्य व उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांच्यामार्फत दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन (DMICDC) ची स्थापना करण्यात आली आहे. तर राज्य शासनामार्फत महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची नोडल एजन्सी म्हणून नियुक्त करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या कार्यवाहीसाठी DMICDC मार्फत DMIC Trust ची स्थापना करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी DMIC Trust व एमआयडीसी यांच्या संयुक्त भागीदारीतून (Joint Venture) दिघी, शेंद्रा व इतर ठिकाणी औद्योगिक नगरे विकसित करण्यात येणार असून त्यासाठी प्रत्येक नोडसाठी, औद्योगिक नगरीसाठी विशेष हेतू कंपनी (SPV) स्थापन करण्यात येणार आहे. तसेच विशेष हेतू कंपनीची रचना, कार्ये व अधिकार तसेच विशेष हेतू कंपनीमधील राज्य व केंद्र शासनासाठी गुंतवणूक यासंदर्भात DMIC Trust व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्यामध्ये शेअर होल्डींग ॲग्रीमेंट (SHA) करण्याचे प्रस्तावित होते. तसेच सदर विशेष हेतू कंपनी (SPV) ला राज्य शासनामार्फत उपलब्ध करून द्यावयाच्या सुविधा, सवलती व सहाय्य यासंदर्भात राज्यशासन, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ व डीएमआयसी ट्रस्ट यांच्यामध्ये स्टेट सपोर्ट ॲग्रीमेंट (SSA) करण्याचे प्रस्तावित होते. त्यानुसार शेअर होल्डींग ॲग्रीमेंट (SHA) व स्टेट सपोर्ट ॲग्रीमेंट (SSA) च्या मसूद्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय :-**

दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर या महत्वाकांक्षी प्रकल्पांतर्गत येणाऱ्या औद्योगिक क्षेत्रासाठी DMIC Trust, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ व राज्य शासन यांच्यामध्ये झालेल्या स्टेट सपोर्ट ॲग्रीमेंटनुसार (SSA) खालील नमूद केलेल्या सुविधा, सवलती व सहाय्य उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देत आहे.

१. डीएमआयसी ट्रस्ट व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्यामध्ये झालेल्या शेअर होल्डींग ॲग्रीमेंट मधील तरतुदीनुसार राज्य शासन भारतीय राज्यघटनेच्या कलम २४३ क्यू मधील तरतुदींनुसार अधिसूचनेव्दारे जे क्षेत्र औद्योगिक नगरी म्हणून घोषित करील ते क्षेत्र महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषद किंवा पंचायती इ. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अधिकार क्षेत्रातून वगळण्यात येतील.

२. दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर या प्रकल्पांतर्गत येणाऱ्या औद्योगिक क्षेत्रात काम करण्यासाठी जाणे-येणेसाठी तसेच जमिनीच्या वापरासाठी विशेष हेतू कंपनीस कोणत्याही अडथळ्याशिवाय कायमपणे शासनाकडून मार्ग (Access) दिला जाईल.

३. विशेष हेतू कंपनीने किंवा त्यांच्यावतीने नियुक्त केलेल्या अधिकृत व्यक्तीकडून लेखी विनंती केल्यावर व प्रचलित नियमातील तरतुदींचे पालन केल्यावर औद्योगिक नगरीचा विकास करण्यासाठी तसेच ट्रंक इन्फ्रास्ट्रक्चर व स्ट्रॅटेजिक प्रकल्पासाठी आवश्यक असणाऱ्या परवानग्या व आवश्यक पायाभूत सुविधा विशेष हेतू कंपनीस उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यक ती सर्व मदत व सहाय्य राज्य शासनाकडून पुरविण्यात येईल.

४. विशेष हेतू कंपनीस दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर प्रकल्पांतर्गत येणाऱ्या औद्योगिक क्षेत्रात कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी पोलिसांचे सहाय्य पुरविण्यात येईल. तसेच सदर औद्योगिक क्षेत्रात पाणी, वीज, रस्ते इ. नागरी सुविधा विशेष हेतू कंपनीमार्फत पुरविण्यात येतील.

५. भारतीय राज्य घटनेच्या कलम २४३ क्यू नुसार सदर प्रकल्पांतर्गत येणारे औद्योगिक क्षेत्र औद्योगिक वसाहती म्हणून अधिसूचित करण्यात येणार असल्याने सदर औद्योगिक क्षेत्र हे स्थानिक प्राधिकरणाच्या हद्दीतून वगळण्याची कार्यवाही नगरविकास व ग्रामविकास विभागाने करावी.

६. दिल्ली मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर या प्रकल्पासाठी करण्यात येणारे भुसंपादन हे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून करण्यात येणार असून अधिग्रहित केलेल्या किंवा महामंडळाकडून विकत घेण्यात येणाऱ्या जमिनीचे विशेष हेतू कंपनीस होणाऱ्या हस्तांतरणाच्या दस्तऐवजावरील मुद्रांक शुल्क तसेच विशेष हेतू कंपनीने (SPV) या प्रकल्पासाठी जमीन संपादीत केल्यास त्यावरील मुद्रांक शुल्क भारतीय मुद्रांकन शुल्क कायदा, १८९९ च्या कलम ९ नुसार माफ करण्यात येईल. त्यासाठी महसूल व वन विभागाने आवश्यक अधिसूचना निर्गमित करावी.

७. विशेष हेतू कंपनी (SPV) कडून पायाभूत सुविधांचा विकास व इतर सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी अनुवर्ती भाडेपट्ट्यांतर्गत देण्यात येणाऱ्या क्षेत्रासही उपरोक्त मुद्दा क्र. ६ मध्ये नमूद केलेली मुद्रांक शुल्कातील सूट अनुज्ञेय राहील.

८. राज्य शासनाकडून सदर औद्योगिक क्षेत्रातील प्रकल्पांना प्रचलित औद्योगिक व इतर धोरणांनुसार फायदे अनुज्ञेय राहतील.

९. सदर औद्योगिक वसाहतीत विद्युत वितरणाचे अधिकार विशेष हेतू कंपनीस देण्याबाबत राज्य शासन विद्युत अधिनियम २००३ अंतर्गत राज्य वीज नियामक आयोगास शिफारस करेल. तसेच राज्य शासन विशेष हेतू कंपनीस किंवा त्यांनी नियुक्त केलेल्या व्यक्तीस विद्युत निर्मितीबाबत आवश्यक ते सहाय्य करील.

१०. दिल्ली- मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर या अंतर्गत येणाऱ्या प्रकल्पासाठी विशेष हेतू कंपनी स्थापन करण्यात येणार असून, विशेष हेतू कंपनीस (SPV) महाराष्ट्र प्रादेशिक नगर रचना अधिनियम १९६६ च्या कलम ४०(१) (अ) नुसार विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून नियुक्त करण्यात येईल. त्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ मध्ये सुधारणा करण्याची उचित कार्यवाही महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ व नगर विकास विभागाने करावी.

११. दिल्ली- मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर या अंतर्गत येणाऱ्या प्रकल्पासाठी औद्योगिक क्षेत्र भारतीय संविधानाच्या कलम २४३ क्यू अंतर्गत औद्योगिक नगरे म्हणून घोषित झाल्यानंतर शासनामार्फत किंवा स्थानिक प्राधिकरणामार्फत मालमत्ता कर किंवा इतर कर व फी आकारण्यात येणार नाही. त्यासाठी महाराष्ट्र नगरपरिषद व नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ मध्ये आवश्यक त्या सुधारणा करण्यात याव्यात. मात्र, सदर क्षेत्र हे औद्योगिक क्षेत्र म्हणून घोषित होईपर्यंत त्यांना स्थानिक कर लागू राहणार आहेत.

१२. दिल्ली- मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर या प्रकल्पांतर्गत येणाऱ्या औद्योगिक नगरींसाठी राज्य शासनाच्या प्रचलित नियमांनुसार आकारणी करून तसेच वेळोवेळी निर्धारीत केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून पाण्याचे आरक्षण उपलब्ध करून देण्यात येईल.त्याबाबतची कार्यवाही जलसंपदा विभागाने करावी.

१३. विशेष हेतू कंपनीने पार पाडावयाच्या कार्यासंबंधी केलेल्या शिफारशी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून विचारात घेतल्या जातील व महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ अन्वये त्यावर उचित कार्यवाही केली जाईल.

१४. सर्व योजना, आर्थिक व तांत्रिक बाबी, अभियांत्रिकी आराखडे इ. तयार करणे व ते मंजूर करून घेणे, भांडवलबाबी तसेच प्रकल्पांचे पर्यवेक्षण यासाठी डीएमआयसी हे विशेष हेतू कंपनीस सहाय्य करेल.

१५. डीएमआयसी हे विशेष हेतू कंपनी व इतर शासकीय संस्थांना क्षमता विकासासाठी सहाय्य करेल.

१६. सदर प्रकल्पासाठी विशेष हेतू कंपनीच्या वतीने डीएमआयसी कडून (महाराष्ट्र शासन, डीएमआयसी ट्रस्ट आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्या सर्वानुमते) Transparent Competitive Bidding प्रकियेचा अवलंब करण्यात येईल.

१७. विशेष हेतू कंपनीने मिळविलेला सर्व नफा हा केवळ महाराष्ट्र राज्यातील औद्योगिक नगरी प्रकल्पाच्या विकासासाठी वापरण्यात येईल. अशा प्रकारचा नफा औद्योगिक नगरीच्या गरजेपेक्षा अधिक असला तर त्याचा वापर महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ व डीएमआयसी ट्रस्ट यांच्या परस्पर सहकार्याने राज्यातील इतर औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास तसेच उत्पादन प्रकल्पांचा विकास यासाठी केला जाईल.

१८. औद्योगिक नगरीमध्ये कायदा व सुव्यवस्था, आरोग्य सेवा (विशेषत: कमी उत्पन्न असलेल्या नागरिकांसाठी), जन्म- मृत्युची नोंद इ. आरक्षित बाबी या महाराष्ट्र शासनाकडून पुरविण्यात येतील. तथापि, उपरोक्त आरक्षित बाबी या अंशत: किंवा पुर्णत: विशेष हेतू कंपनीकडून पुरविण्याचे ठरविल्यास योग्य त्या अटी व शर्तींवर त्यास शासनाची मान्यता देण्यात येईल.

१९. दिल्ली- मुंबई इंडस्ट्रीयल कॉरीडॉर या प्रकल्पांतर्गत स्थापन करण्यात आलेली विशेष हेतू कंपनी ही नियमितपणे शासकीय अधिकारी व शासनाच्या प्रतिनिधींसोबत सहकार्य करील.

२०. वरील आरक्षित बाबींच्या सुलभ पूर्ततेसाठी महाराष्ट्र शासन व विशेष हेतू कंपनी यांच्या प्रतिनिधींची Joint Co-ordination Committee ची स्थापना करण्यात येईल. तसेच सदर कमिटीची बैठक तीन महिन्यातून किमान एकदा होईल.

२१. विशेष हेतू कंपनीस सर्व अंमलात असलेले कायदे, परवाने तसेच स्टेट शेअर ॲग्रीमेंट (SHA) व स्टेट सपोर्ट ॲग्रीमेंट (SSA) मध्ये केलेल्या तरतुदींची पूर्तता करणे बंधनकारक असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२११७५४१८१४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Latke Vaijanath B

Digitally signed by Latke Vaijanath B
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Latke Vaijanath B
Date: 2015.01.21 18:03:47 +05'30'

**(वै. भू. लटके)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. अप्पर मुख्य सचिव, (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) मा. प्रधान सचिव (नवि-१), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) मा. प्रधान सचिव (नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) मा. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मा. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१५) महाव्यवस्थापक (डीएमआयसी प्रकल्प),महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१६) निवडनस्ती (उद्योग-१४)